**विचारवंताचा पोकळ विचार**

भारतीय नियोजनाच्या क्षेत्रात तार्लोक सिंग हे एक बड़े नाव आहे. १९५० मध्ये नियोजन मंडळाची स्थापना झाल्यापासून १९६७ पर्यंत त्यांचा येथील नियोजनाशी खूप घनिष्ट संबंध होता. त्यातही, १९४५ मध्ये प्रसिद्ध झालेल्या 'पॉव्हर्टी अँड सोशल चेंज' या पुस्तकाचा दबदबा मोठा. अशा एका अधिकारी व्यक्तीचे अनुभव या दोन ग्रंथांत ग्रथित झालेले. साहजिकच त्यांचा विचार त्याच मापाने जोखला पाहिजे.

पॉव्हर्टी अँड सोशल चेंज' या आपल्या पुस्तकात, भारतातील ग्रामीण समाजरचना व स्थिती लक्षात घेऊन, भारतीय सामाजिक-आर्थिक पुनर्रचनेचा मार्ग त्यांनी सांगितला होता. भारत हा शेतकीप्रधान, खेडूत देश. तेव्हा पुनर्रचनेची सुरुवात खेड्यांपासून व त्यातही शेतीपासून व्हायला हवी. शेतीचे उत्पादन वाढायचे तर मुख्य अडचण कोणती? फार लहान तुकडे पाडून शेती केली जाते आणि जोवर शेताचे क्षेत्र- नांगरटीपेक्षाही व्यवस्थापनाचे - पुरेसे मोठे होत नाही तोवर उत्पादनवाढीच्या दृष्टीने फार पुढे पाऊल पडणार नाही ही खाजगी मालकीचे तत्त्व, आणि शेतजमिनींच्या मालकीतली व धारणेतली विषमता मान्य करून त्यांनी यावर 'जॉईंट व्हिलेज मॅनेजमेंट'चा तोडगा सुचविला होता. प्रत्यक्षात याची कार्यवाही कशी करता येईल याचा अत्यंत तपशीलवार विचार त्यांनी आपल्या पुस्तकात केला होता. या योजनेची काही वैशिष्ट्ये अशी होती : जमीन मालकांना मालकीबद्दल त्यांच्या मालकीच्या प्रमाणात उत्पादनातील ठराविक हिस्सा मिळावयाचा होता. कुटुंब हे एकक मानून, कसणुकीसाठी कुटुंबास एका बैलजोडीने जेवढी जमीन कसता येईल तेवढी जमीन दिली जावयाची होती. जे जमीनमालक शेती करणार असतील त्यांनाही कसणुकीसाठी सामान्यतः याच नियमाने जमीन दिली जावयाची होती. पाच वर्षे हे क्षेत्र त्या त्या कुटुंबाकडे रहावयाचे होते. पण कोणती पिके घ्यावयाची, किती व कोणत्या बाबींवर भांडवली गुंतवणूक करावयाची, शेतीच्या कोणत्या पद्धती वापरावयाच्या यांविषयीचे निर्णय शेतकरी कुटुंब व्यक्तिशः घेणार नव्हते तर गाव पंचायत प्रत्येक कुटुंबातून एक व्यक्ती घेऊन बनवलेली घेणार होती. यामुळे गावशिवारातील एकंदर जमिनीचा शेतीच्या दृष्टीने एक एकक म्हणून विचार करता येईल व शेती सुधारणेच्या मार्गातील अडचण दूर होईल अशी कल्पना.

गावातील बलुतेदार-कारागीर, शेतमजूर इ. इतर वर्गांना कामधंदा मिळेल याची काळजी गावपंचायतीने वहावी असे या योजनेत अभिप्रेत होते. तार्लोक सिंग यांच्या विवेचनात त्यावर भर दिलेला होता. आणि शेतीच्या व्यवस्थापनेसाठी जे गाव एकत्र येईल त्याला आपल्या गावातील मनुष्यबळ आणि इतर साधनसंपत्ती यांच्या कमाल व लाभदायी उपयोगाच्या दृष्टीने अधिक परिणामकारक कृती करता येईल, या साधनांची उत्पादनक्षमता वाढविता येईल, नवीन गोष्टींचा स्वीकार करणे सुलभ होईल, असे त्यांचे म्हणणे होते.

या योजनेतील मूल्ये व दृष्टिकोन स्पष्ट आहेत. आर्थिक विकास व सामाजिक न्याय या गोष्टी सहकाराच्या मार्गाने साकार केल्या जाव्यात, संघर्ष हा परिणामकारक मार्ग होऊ शकत नाही, तो आजच्या सामाजिक रचनेत व्यवहार्यही ठरणार नाही. आणि तार्लोक सिंग यांच्या म्हणण्यात तथ्य होते.

भारताच्या औद्योगीकरणाचा घाट कसा असावा या विषयीही त्यांनी आपल्या पुस्तकात एक निश्चित भूमिका मांडली होती. 'भारताच्या बाबतीत, सार्वत्रिक दारिद्र्याचे निवारण कसे करावयाचे या प्रश्नाने औद्योगिक विकासाची उद्दिष्टे निश्चित होतात. (पृ. १४७ ). ग्रामीण भागातील जनतेच्या गरजा आणि समस्या समोर ठेवून त्यांच्या पूर्ततेच्या व सोडवणुकीच्या दृष्टीने इष्ट अशा धर्तीचे औद्योगिक संघटन व औद्योगीकरणाचा कार्यक्रम यांचे नियोजन करणे हे आपल्यावर बंधनकारक आहे. (पृ. १४९) "

१९५० नंतरच्या वीस वर्षांत तार्लोक सिंग यांच्या कल्पनेप्रमाणे खेड्यांची व शेतीची पुनर्रचना घडून आली नाही आणि औद्योगीकरणाचा घाटही सर्वस्वी विरुद्ध भूमिकेतून निर्माण केला गेला आणि जवळजवळ या संपूर्ण कालखंडात तार्लोक सिंग हे नियोजन मंडळाचे चिटणीस किंवा सभासद होते!

१९६९ साली आपल्या 'पॉव्हर्टी अँड सोशल चेंज' या पुस्तकास त्यांनी एक १२२ पानी 'मूल्यांकनात्मक टिपण' जोडले आहे. आपल्या योजना प्रत्यक्षात का येऊ शकल्या नाहीत याचे विवेचन ते करतील अशी अपेक्षा. पण या टिपणाचा बराचसा भाग जुन्या विवेचनात आणखी काही तपशील भरण्यातच खर्ची पडला आहे. शेतीची व खेड्याच्या कारभाराची सामूहिक व्यवस्था व ग्रामीण भागातच ग्रामीण लोकांना रोजगार उपलब्ध करून देण्याचे उद्दिष्ट अग्रक्रमाने साध्य करणारे औद्योगिकीकरण हे दोन कार्यक्रम जेथे मुळातच मान्य झाले नाहीत तेथे तपशील भरण्याची कलाकुसर विशेष उपयोगाची नव्हती.

१९५० ० ते १९६७ या काळात विविध प्रसंगी केलेली भाषणे, लिहिलेले लेख यांचा 'टुवर्ड्स अॅन इंटिग्रेटेड सोसायटी’ हा बृहद् संग्रह वाचतानादेखील अशीच प्रतिक्रिया होते. आर्थिक विकास, सामाजिक पुनर्रचना, नियोजन व त्याची अंमलबजावणी यांच्याशी संबंधित विषयांवर, ज्या वास्तव परिस्थितीत हे सर्व घडून यावयाचे त्या परिस्थितीतील तणाव, संघर्ष व यशापयश यांची नाळ तोडून, पंतोजीछाप केलेले व म्हणून शब्दबंबाळ ठरणारे हे बरेचसे लेखन. १९७० साली कचऱ्याची टोपली (किंवा वाचनालयातले कपाट) हीच अशा लेखनाची योग्य जागा आहे.

कचऱ्याच्या टोपलीत टाकण्यास योग्य असे सगळे लेखन बाद केल्यावर 'मूल्यांकनात्मक टिपण' व ' टुवर्ड्स अॅन इंटिग्रेटेड सोसायटी' हे पुस्तक मिळून असलेल्या एकंदर सुमारे ७०० पानांपैकी ५-६ पाने उरतात. गेल्या वीस वर्षांतील आपल्या कामगिरीचा व त्यात राहिलेल्या कमतरतेचा, या कामगिरीतून तीव्र बनलेल्या समस्यांचा एक चांगला आढावा 'टुवर्ड्स अॅन इंटिग्रेटेड सोसायटी' मध्ये पृ. २६९-७० यांवर आपणास मिळतो. आजच्या परिस्थितीचे सम्यक निदान 'मूल्यांकनात्मक टिपणा'त ('पॉव्हर्टी अँड सोशल चेंज', २ री आवृत्ती) पृ. २३२-३३ यांवर मिळते. तार्लोक सिंग यांची समज मार्मिक असल्याच्या खुणा आणखी पाचपंधरा ठिकाणी मिळतात.

"व्यवहार्यतेच्या कसोटीवर उतरणारी त्यांची 'सामूहिक सहकारी व्यवस्थापना'ची योजना अमलात का येऊ शकली नाही याचे त्यांनीच एका वाक्यात कारण सांगून टाकलेले आहे : ज्या समाजात संपत्ती, उत्पन्न व संधी यांच्या बाबतीत ठळक, कमालीची विषमतेची परिस्थिती अस्तित्वात असते तेथे आर्थिक व्यवहारांच्या संघटनेचे सूत्र म्हणून सहकार

भरीव व महत्त्वपूर्ण अशी भूमिका बजावू शकत नाही." (टुवर्ड्स अॉन इंटिग्रेटेड सोसायटी, पृ. १२१)

ही विषमतेची परिस्थिती स्वातंत्र्यचळवळीच्या गाभ्याशी असलेल्या ध्येयवादी प्रेरणांच्या अभिव्यक्तीमधून बदलेल म्हणजे सामाजिक न्याय प्रस्थापनेच्या मार्गाने आर्थिक विकास साधण्यात आपणास यश येईल ही तार्लोक सिंगांची श्रद्धा. लोकशाहीच्या स्वीकाराने, ती 'लोकांची शाही' असणार तेव्हा, समता प्रस्थापनेच्या दिशेने प्रभावी दडपण येईल ही आशा त्यांनी बाळगली होती. भारतात बहुतेक सर्व ध्येयवादी मंडळींनी आपल्या मनात ठसलेली वैचारिक पातळीवरील आदर्शीकृत लोकशाही आणि प्रत्यक्ष व्यवहारातल्या आजच्या राजकारणी लोकशाहीचे स्वरूप यांतील भेद न जाणण्याचा भोळसटपणा केला आहे, तेच तार्लोक सिंग यांच्या बाबतीत घडले. खेड्यांच्या समाजरचनेचा जवळून दीर्घ काळ अभ्यास केल्याचा दावा करणाऱ्या तार्लोक सिंगांनी सतेचे वाटप, तिची रचना, सतेच्या क्षेत्रातले संबंध या सगळ्यातून परंपरेने चालत आलेले व्यवहार व सत्ताधाऱ्यांची उद्दिष्टे, ती साधण्याची त्यांची साधने व तंत्रे यांकडे इतके संपूर्ण दुर्लक्ष करावे हा त्यांचा कमालीचा भोळसटपणा म्हणावा लागेल. त्यांच्यासारख्यांच्या या भोळसटपणाचे घातक परिणाम आपण भोगीत आहोत.

सर्वप्रथम, राजकीय कृतीच्या द्वारा सत्तेच्या क्षेत्रातला विषम तोल बदलण्याची गरज स्पष्ट आहे. पण त्याचा मार्ग कोणता, ती राजकीय कृती कोणती? पारंपरिक वर्गसंघर्षवादी की पारंपरिक वर्गसमन्वयवादी भूमिका घ्यावी? वर्ग संघर्ष (अनेक कारणांनी) आकर्षक व सोपा वाटतो, केवळ लांब राहून तत्त्वचिंतन करणाऱ्यांना अटळ व अपरिहार्य भासतो, पण प्रत्यक्ष कार्य करणाऱ्यास त्याची वैय्यर्थता गेल्या वीस वर्षांच्या अनुभवाने पटावी. वर्गसमन्वयाचा मार्ग हा गेल्या वीस वर्षात ज्यावरून आपण वाटचाल केली तो. त्याचे परिणाम आपण अनुभवीत आहोत. पारंपरिक वर्गसंघर्ष व वर्ग समन्वय दोन्ही टाकाऊ ठरले आहेत. एक ना एक दिवस मुक्तिसेना स्थापन करून तिच्या सहाय्याने अत्यंत भ्रष्ट व मोडकळीस आलेल्या समाजातली सत्तास्थाने आपण काबीज करू असे ज्यांचे भविष्याविषयीचे निदान आहे त्यांची गोष्ट वेगळी. (ते निदान बरोबर आहे की चूक हा प्रश्न येथे अप्रस्तुत आहे. ) पण ज्यांचे निदान वेगळे आहे वा ज्यांची तत्त्वनिष्ठा वेगळी आहे त्यांना वेगळाच मार्ग शोधून काढला पाहिजे.

हा मार्ग कोणचा असेल याचे दिग्दर्शन अंशतः गांधींच्या विधायक 'रचनात्मक' कार्यक्रमात व विनोबांच्या 'भूदान-ग्रामदान' कल्पनेत घडते. अंशतः अशाकरिता म्हणायचे की, नवसमाज निर्मितीसाठी लोकशक्ती निर्माण करण्याचे मार्ग, व कार्यक्रम त्यातून सूचित होतात पण या लोकशक्तीला प्रस्थापित हितसंबंधांविरुद्ध जो संघर्ष - अहिंसक असहकारात्मक - करावा लागेल तो कसा असेल, तो कसा करावा या बाबतीत त्यातून मार्गदर्शन मिळत नाही. गांधीची सत्याग्रह कल्पना येथे प्रस्तुत आहे. पण सत्याग्रहाचे स्वातंत्र्यपूर्व काळातील प्रकार हे फारसे उपयोगाचे नाहीत हे स्पष्ट झाले. सत्याग्रहाचे नवे प्रकार शोधून काढले पाहिजेत.

तार्लोक सिंगांच्या लेखनात विधायक व संघर्षात्मक राजकीय कृतीची आवश्यकता एकाही ठिकाणी प्रतिपादलेली नाही! विचारवंतांच्या निर्लेप, अलिप्त परंपरेला शोभेशीच ही गोष्ट आहे.